वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग दुसरा नुसार भारत छोडो आंदोलनाच्या स्मृतीप्रित्यर्थ दर वर्षी दिनांक ९ ऑगस्ट रोजी मा. राष्ट्रपतींच्या हस्ते, राष्ट्रपती भवन, नवी दिल्ली येथे राज्यातील स्वातंत्र्य सैनिकांच्या सत्कार समारंभाकरिता लागणारी रक्कम संक्षिप्त देयकावर काढण्याकरिता प्रशासनिक विभागास वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत...
(वित्तीय मर्यादेत वाढ करण्याबाबत)

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बियुडी १४१५/प्र.क्र.१८६/स्वासैक १**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १९ ऑगस्ट,२०१७.

वाचा: **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बियुडी १४१५/प्र.क्र.१८६/स्वासैक १, दिनांक ७.४.२०१७.**

**प्रस्तावना:-**

भारत छोडो आंदोलनाच्या स्मृतीप्रित्यर्थ दर वर्षी दिनांक ९ ऑगस्ट रोजी मा. राष्ट्रपतींच्या हस्ते राष्ट्रपती भवन, नवी दिल्ली येथे राज्यातील स्वातंत्र्य सैनिकांचा सत्कार केला जातो. नवी दिल्ली येथे स्वातंत्र्य सैनिकांचे व त्यांच्या जोडीदाराचे, शासनाचे समन्वय अधिकारी/कर्मचारी यांचेकरिता प्रवास खर्च, निवास व्यवस्था, वाहतूक व्यवस्था/भोजन व्यवस्था व त्यानुषांगिक बाबींवर लागणा-या खर्चाकरिता रक्कम संक्षिप्त देयकाद्वारे दरवर्षी काढण्यासाठी कायमस्वरुपी मान्यता घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने संक्षिप्त देयकाद्वारे प्रती वर्ष रु.७५,०००/-(रुपये पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या वित्तीयमर्यादेत काढण्यास त्या सोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये दर्शविलेल्या अटींच्या अधीन राहून, प्रशासनिक विभागास “विशेष बाब” म्हणून वित्तीय अधिकार प्रदान करण्यास दिनांक ७.४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. आता सदर वित्तीय मर्यादा वाढविण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, भाग-२ अंतर्गत, दिनांक ९ ऑगस्ट रोजी मा. राष्ट्रपतींच्या हस्ते राष्ट्रपती भवन, नवी दिल्ली येथे राज्यातील स्वातंत्र्य सैनिकांच्या सत्काराकरिता, नवी दिल्ली येथे स्वातंत्र्य सैनिकांचे व त्यांच्या जोडीदाराचे, शासनाचे समन्वय अधिकारी/कर्मचारी यांचे वास्तव्य, भोजन व चहापान आणि प्रवास खर्चाकरिता दर वर्षी लागणारी रक्कम, संक्षिप्त देयकाद्वारे रु.७५,०००/- (रुपये पंच्याहत्तर हजार फक्त) प्रती वर्षावरुन आता

वाढवून प्रती वर्ष रु. १,२०,०००/- (रुपये एक लाख विस हजार फक्त) इतक्या मर्यादेत काढण्यास या सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविलेल्या अटींच्या अधीन राहून, प्रशासनिक विभागास "विशेष बाब" म्हणून वित्तीय अधिकार प्रदान करण्यास या शासन निर्णयाद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबीवरील खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. ए-५, लेखाशीर्ष २२५१, सेक्रेटरीएट, सामाजिक सेवा-०९२- इतर कार्यालये (००) (०१) स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समिती -१३- कार्यालयीन खर्च (सांकेतांक क्र.२२५१ ०३२९) या लेखाशीर्षाखाली टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २९०/२०१७/व्यय-४, दिनांक २१.०४.२०१७ व अनौपचारिक संदर्भ क्र.२२४/विनियम/१५.०५.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१९१३५२१५२४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत: परिशिष्ट **"अ"**

Hanmant Jagganath Rasal

Digitally signed by Hanmant Jagganath Rasal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa5a26bbb1ae8c65f6ab3de577da5d26d29af7d3012 5e55ab23c596b7a00f970, cn=Hanmant Jagganath Rasal
Date: 2017.08.19 13:42:39 +05'30'

**(ह. ज. रसाळ)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई,
२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
३. सह सचिव (स्वासैक), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४. उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
५. अवर सचिव, वित्त विभाग, (व्यय-४) (विनियम), मंत्रालय, मुंबई-३२,
६. सामान्य प्रशासन विभाग,रोखशाखा (कार्यासन २६)/का.२५, मंत्रालय,मुंबई-३२,
७. निवड नस्ती ( स्वासैक-१)

**************************

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बियुडी १४१५/प्र.क्र.१८६/स्वासैक , दिनांक १९/०८/२०१७ सोबतचे परिशिष्ट "अ"

*दिनांक ९ ऑगस्ट रोजी राज्यातील स्वातंत्र्य सैनिकांची नवी दिल्ली येथे मा. राष्ट्रपतींच्या हस्ते होणा-या सत्कारप्रसंगी स्वातंत्र्य सैनिकांचे दिल्ली येथील वास्तव्य व प्रवास खर्चासाठी होणारा खर्च अदा करण्याबाबतचे वित्तीय प्राधिकार.*

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप भाग दुसरा अन्वये महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये विभागास विशेष बाब म्हणून प्रदान करण्यात आलेला वित्तीय अधिकार.

| भाग दुसरा | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | वित्तीय शक्तीची मर्यादा | | | |
| अ.क्र. | वित्तीय शक्तीचे वर्णन/सध्याच्या प्राधिकाराच्या शासन निर्णयाचा क्रमांक | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम प्राधिकारी | अस्तित्वात असलेली वित्तीय मर्यादा | विभागाने प्रस्तावित केलेली वित्तीय मर्यादा | वित्त विभागाने मंजूर केलेली वित्तीय मर्यादा | अटी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बियुडी १४१५/प्र.क्र.१८६/स्वासैक १, दिनांक ७.४.२०१७.<br>दरवर्षी दिनांक ९ ऑगस्ट रोजी मा. राष्ट्रपतींच्या हस्ते नवी दिल्ली येथे स्वातंत्र्य सैनिकांचा सत्कार समारंभ कार्यक्रमाकरिता महाराष्ट्र राज्यातर्फे पाठविण्यात येणा-या स्वातंत्र्य सैनिकांकरिता व प्रत्येक स्वातंत्र्य सैनिकांसोबत जाणा-या एका व्यक्तीकरिता, तसेच त्यांची व्यवस्था पहाण्यासाठी नवी दिल्लीस जाणा-या समन्वयक अधिकरी/ कर्मचारी यांच्याकरिता प्रवास खर्च, निवास व्यवस्था/वाहतुक व्यवस्था/ भोजन व्यवस्था/तदानुषंगिक बाबींवर लागणा-या खर्चाकरिता आवश्यक असलेली रक्कम संक्षिप्त देयकावर काढणेस मंजुरी देणेबाबत.. | प्र.स. व वि.चौ.अ.१, साप्रवि | रु.७५,०००/- | रु.१.५० लाख पर्यंत | रु.१,२०,०००/- वार्षिक | १. या वित्तीय शक्तीसाठी वित्तीय अधिकर नियम पुस्तिका, १९७८ मधील शासन निर्णय दिनांक १७.४.२०१५ मधील उप विभाग-दोन, अ.क्र.११-अ, नियम ३४ चा वापर करता येणार नाही.<br>२. खर्चाला मंजुरी देण्यासंबंधीचे अधिकार वित्तीय प्राधिका-यांना असले तरच संक्षिप्त देयकावर रक्कम काढता येईल.<br>३. खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.<br>४. या वित्तीय शक्तीचा वापर करुन वेतन व भत्ते याकरिता संक्षिप्त देयके सादर करता येणार नाही.<br>५. काटकसरीच्या आदेशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>६. कोणत्याही परिस्थितीत संबंधित कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिका-यांकडे सहा महिन्यापूर्वी काढलेल्या एकाही संक्षिप्त देयकाचे तपशिलवार |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | देयक लेखा परिक्षकांना सादर करण्याचे प्रलंबित असू नये.<br>७. संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्यासाठी कार्यालयाकडून ज्ञापन/आदेश काढण्यात यावा व त्यामध्ये ज्या बाबींसाठी रक्कम काढावयाची आहे त्यामध्ये पुढील बाबींचा उल्लेख करण्यात यावा.<br>अ. या कार्यालयाकडे एकही संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक लेखा परीक्षकांना सादर करण्याचे प्रलंबित नाही.<br>ब. या ज्ञापनान्वये काढण्यात येणा-या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित कालावधीत सादर करण्यात येईल.<br>क. संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक सादर करण्यास जबाबदार असलेल्या संबंधित अधिका-याचे (उदा. आहरण व संवितरण अथवा अन्य) पदनाम विहित करावे.<br>ड. खर्च संक्षिप्त देयकाद्वारे करणे अनिवार्य आहे.<br>८. मंजुरी प्राधिका-याला सदर खर्चाच्या बाबींसाठी प्राप्त झालेल्या वित्तीय शक्तीचा उल्लेख मंजुरी ज्ञापनात/आदेशात करण्यात यावा.<br>९. संक्षिप्त देयकावर काढलेल्या रक्कमेतून खरेदी करावयाची असल्यास तत्संबंधीची पूर्व तयारी केलेली असावी. (उदा. निविदा, करारपत्रे अंतिम करणे इत्यादी) |

************